गृह (परिवहन) विभागातील उपप्रादेशिक
परिवहन अधिकारी सर्वसाधारण बदल्या
(सन २०१७)....

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
### शासन आदेश क्रमांकः एमव्हीडी ०४१७/प्र.क्र.८९/परि-४

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक: ७ एप्रिल, २०१७

**शासन आदेश -**

सार्वजनिक सेवेच्या हितार्थ महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनीयमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम २००५ मधील तरतूदीनुसार बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने खालील तक्यात नमूद उपप्रादेशिक परिवहन अधिकारी संवर्गातील अधिकाऱ्यांची प्रशासकीय कारणास्तव बदलीने त्यांच्या नावासमोर स्तंभ क्रमांक - ४ मध्ये दर्शविलेल्या पदावर पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नांव | सध्याची पदस्थापना | बदलीनंतरची पदस्थापना |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | सौ. हेमांगिनी पाटील | ठाणे | पनवेल |
| २ | श्री. आनंद पाटील | पनवेल | पिंपरी चिंचवड |
| ३ | श्री. अनिल पाटील | पुणे | वसई |
| ४ | श्री. अजित शिंदे | पिंपरी चिंचवड | कराड |
| ५ | श्री. स्टीव्हन अल्वारीस | कराड | कोल्हापूर |
| ६ | श्री. रविंद्र भुयार | नागपूर (पुर्व) | गडचिरोली |
| ७ | श्री. अशफाक अहमद खान | बीड | जालना |
| ८ | श्री. विनोद सगरे | नांदेड | पुणे |
| ९ | श्री. प्रदिप शिंदे | नियुक्तीच्या प्रतिक्षेत | मुंबई (मध्य) |
| १० | श्री. सुभाष पेडामकर | मुंबई (मध्य) | सिंधुदुर्ग |
| ११ | श्री. अभय देशपांडे | वसई | नांदेड |
| १२ | श्री. परवेझ तडवी | श्रीरामपुर | बुलढाणा |

२. सदर अधिकाऱ्यांनी त्यांच्या नवीन पदाचा पदभार त्वरित स्विकारावा तसेच त्यांनी अनधिकृत रजेवर जाऊ नये. त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभागाच्या क्रमांक-सीडीआर १०८२/२५६७/२८/अकरा, दि. ३० ऑगस्ट, १९९२ च्या परिपत्रकाकडे वेधण्यात येत आहे. त्यात दिलेल्या सूचना लक्षात घेऊन बदली रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास, ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील याची संबंधीतांनी नोंद घ्यावी.

३.     संबंधीत नियंत्रक अधिकाऱ्यांनी सदर बदली करण्यात आलेल्या अधिकाऱ्यांस त्यांच्या सध्याच्या पदभारातून तात्काळ कार्यमुक्त करुन त्यांना नवीन नेमणूकीच्या जागी तातडीने रुजू होण्यास सांगावे. तसेच या आदेशाची प्रभावीपणे अंमलबजावणी होण्याकरीता बदली झालेल्या अधिकाऱ्यांचे कोणत्याही परिस्थितीत दिनांक १ जुलै, २०१७ पासूनचे वेतन बदलीपूर्व कार्यालयाने काढू नये. याची संपूर्ण जबाबदारी संबंधीत नियंत्रक अधिकाऱ्याची असेल.

४.     संबंधीत अधिकाऱ्यांनी नवीन पदस्थापनेच्या ठिकाणी विहित कालावधीत रुजू व्हावे व पदभार स्विकारल्याचा अहवाल परिवहन आयुक्त कार्यालयामार्फत शासनास सादर करावा.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४०७१३२२१९५६२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Tikamdas N. Shikharame

Digitally signed by Tikamdas N. Shikharame
DN: CN = Tikamdas N. Shikharame, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Home Department
Date: 2017.04.07 17:44:04 +05'30'

**(टि.एन.शिखरामे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,
मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
मा.मुख्यमंत्रयांचे सचिव, मंत्रालय,मुंबई
मंत्री / राज्यमंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई
परिवहन आयुक्त , महाराष्ट्र राज्य, मुंबई
महालेखापाल , (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२ , मुंबई / नागपूर
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व जिल्हे)
प्रादेशिक परिवहन अधिकारी (सर्व)
उपप्रादेशिक परिवहन अधिकारी (सर्व)
निवड नस्ती (परि ४)